वन विभागाची पुनर्रचना व्यवस्थापकीय माहिती प्रणाली अंतर्गत सांख्यिकी विषयक निर्माण केलेल्या पदांना सन २०२०-२१ मध्ये मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-एफडीएम -२०२०/प्र.क्र.२१/फ-२**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- ३० मार्च, २०२०**

**वाचावे :-** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग,क्रमांक-एफडीएम-२०१९/प्र.क्र.३२/फ-२, दि. १६.१०.२०१९.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१६ (१९-२०)१७४०, दि.१८.०२.२०२०

**शासन निर्णय :-**

वन विभागाची पुनर्रचना या अनुषंगाने व्यवस्थापकीय माहिती प्रणाली अंतर्गत सांख्यिकी विषयक निर्माण केलेल्या २ पदांना सन २०१९-२० मध्ये ०१.१०.२०१९ दि.२९.०२.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये शासनाची मंजूरी देण्यात आली होती. सदर मुदत दि.२९.०२.२०२० रोजी संपुष्टात आली आहे. तसेच महसूल व वन विभागाने संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या अस्थायी पदाचा समावेश आहे. त्याअनुषंगाने खालील विवरणपत्रातील दोन अस्थायी पदांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.१२.०२.२०२० च्या अधिन राहून दि.०१.०३.२०२० ते ३१.०८.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वनवृत्त | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | वनसांख्यिकी | १ |
| २ | नागपूर | वनसांख्यिकी | १ |
| | | **एकूण** | **२** |

२. याबाबत होणारा खर्च प्रधान शीर्ष - २४०६-वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१ वनीकरण, ००१ संचालन व प्रशासन (००१) वन सांख्यिकी (वेतने) (२४०६ ००५१) या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२०-२१ या वर्षी त्याखालील मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दि.१२.०२.२०२० अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३११४१२०२३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d36623 3b80405514f23a879132aeec, cn=Atul Ashok Kode
Date: 2020.03.31 14:18:16 +05'30'

**(अतुल कोदे)**
**सह सचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक(प्रा.), नाशिक / नागपूर
५) मुख्य वनसांख्यिकी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालय, नागपूर.
६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) वित्त विभाग (व्यय १०/अर्थसं-४), मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / नाशिक
१० कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग,
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.